<u>रोख्र रक्कमेत देय अनुदाने</u>

लघुपाटबंधारे (स्थानिक क्षेत्र)
(१०१ ते २५०० हेक्टर सिंचन क्षमतेपर्यंतची कामे )
(मागणी क्र .एल-३) २७०२, लहान पाटबंधारे सन २०११-१२ करिता योजनांतर्गत अनुदान (बिगर आदिवासी क्षेत्र) <u>लघु पाटबंधारे योजनांचे सर्वेक्षण</u>

**महाराष्ट्र शासन**

ग्रामविकास व जलसधारण विभाग,
शासन निर्णय, क्रमांक लपायो - २०११/ प्र.क्र.१२८/ जल-४
मंत्रालय मुंबई- ४०००३२,
दिनांक २० मे, २०११

**वाचा :-**

१ शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक लपायो-१०९८/प्र.क्र.७६/ जल-१ दिनांक २९ डिसेंबर, १९९२.
२ शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक लपायो-१०९९ /प्र.क्र.३४७ / जल-१ दिनांक ३१ जुलै,२०००
३ शासन परिपत्रक पाट बंधारे विभाग क्र. देदुप्र२००१/(२७४/२००१) सि.व्य.(कामे ) दिनांक २ जुलै २००२
४ शासन परिपत्रक ग्रामविकास व जलसधारण विभाग, क्रमांक लपायो -२००७/ प्र.क्र. १७/जल-४, दिनांक ०८ मार्च, २००७
५ शासन निर्णय,ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.लपायो-२०१०/प्र.क्र.४७/जल-४, दि. २४ नोव्हेंबर,२०१०.
६ शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.लेखानु-२०११/सीआर-६५/अर्थसंकल्प-३,दि. ३१ मार्च,२०११
७ मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे ( स्थानिक स्तर) महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा.क्र.मुअ/लपा/आ-३/१८४३, दिनांक २१ एप्रिल २०११
८ कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे ( स्थानिक स्तर) विभाग, सातारा यांचे जा.क्र.लपा/स्थास्तर/वि/प्रशा२/७९५/२०११, दिनांक २५ एप्रिल २०११

<u>शासन निर्णय :-</u>

सन २०११-२०१२ चा अर्थसंकल्प दिनांक २३ मार्च, २०११ रोजी विधान मंडळास सादर करण्यात आला. सदर अर्थसंकल्पावर मागणीनिहाय चर्चा होऊन संपूर्ण अर्थसंकल्पास मंजूरी मिळेपर्यंतचा खर्च भागविण्यासाठी विधान मंडळाने "महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) विधेयक, २०११" मंजूर केले आहे. सदर विधेयक आता अधिनियमात रुपांतरीत झाले असून ते महाराष्ट्र अधिनियम ५ म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-४, दिनांक ३१ मार्च, २०११ मध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे.

२. लघु पाटबंधारे, स्थानिक क्षेत्रांतर्गत सन २०११-१२ या वित्तीय वर्षाकरीता **"१०१ ते २५० हेक्टर सिंचन क्षमतेच्या योजनांचे सर्वेक्षण "** या योजनेअंतर्गत १०१ ते २५० हेक्टर सिंचन क्षमतेच्या लघु पाटबंधारे योजनेच्या सर्वेक्षणासाठी रुपये ४६२.०० लक्ष तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. सदर तरतूदीमधून रु. २९९.०० लक्ष ( रुपये दोनशे नव्याण्णव लक्ष फक्त ) तरतूद सोबत जोडलेल्या

विवरणपत्रामध्ये दर्शविल्याप्रमाणे १०१ ते २५० हेक्टर सिंचन क्षमतेच्या लघु पाटबंधारे योजनेच्या सर्वेक्षणासाठी संबंधितांना वितरीत करण्यासाठी अधीक्षक अभियंता, ल.पा (स्था.स्त) मंडळ ठाणे, पुणे, औरंगाबाद, अमरावती व नागपूर यांच्याकडे सुपूर्द काण्यात येत आहे. त्यांना असेही कळविण्यात येते की, संदर्भ क्र. ७ च्या प्रस्तावासोबत जोडलेल्या कामांना निधी वितरित करताना अग्रक्रम निश्चित करुन निधी मंजूर करावा.

३. याबाबतचा खर्च " मागणी क्र. एल-३, २७०२, लहान पाटबंधारे- ०१, भूपृष्ठ जल, ८०० इतर खर्च- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०२) लघु पाटबंधारे योजनांचे सर्वेक्षण (०२) (०१) १०१ ते २५० हे. सिंचन क्षमतेपर्यंतच्या लघुपाटबंधारे योजनांचे सर्व्हेक्षण (२७०२ ३३९१) २७ लहान बांधकामे" या लेखाशिर्षाखाली टाकण्यात यावा.

४. हया तरतूदी अंतिम स्वरुपाच्या नसून त्यामध्ये बदल होण्याचा संभव आहे. त्यामुळे वितरीत तरतूदीपेक्षा अधिक खर्च होणार नाही याची खबरदारी घ्यावी. तसेच शासनाचे पूर्व संमतीशिवाय इतर कोणत्याही नवीन बाबींवर खर्च केल्यास वित्तीय शिस्तीचा भंग केल्याबद्दल संबंधीत आहरण व वितरण अधिका-यांना जबाबदार धरले जाईल. महाराष्ट्र अर्थसंकल्पिय नियम पुस्तिका परिच्छेद १७५ मधील तरतुदींनुसार केवळ अर्थसंकल्पात तरतूद केल्यामुळे खर्च करण्याचा प्राधिकार मिळत नसतो. खर्च करण्यास मंजूरी देण्यास सक्षम असलेल्या प्राधिका-याच्या मंजूरीनेच व दिलेल्या नियतवाटपाच्या मर्यादितपर्यंतच खर्च करता येतो. खर्च करताना किंवा खर्च मंजूर करताना वित्तीय औचित्याच्या मान्य सिध्दांताचे उल्लंघन होत नाही याची काळजी घेण्यात यावी.

५. ज्या बाबींसाठी/कामासाठी सन २०११-१२ च्या अर्थसंकल्पात तरतूद केलेली नाही, अशा कोणत्याही बाबींवर किंवा कामांवर खर्च करण्यापूर्वी संबंधित नियंत्रक अधिका-यांनी शासनाचे आदेश असल्याखेरीज कोणत्याही प्रकारे खर्च करु नये किंवा शासनाचे आदेश गृहीत धरुन खर्च करण्याचे प्राधिकार देऊ नयेत. तसेच कोणत्याही परिस्थितीत प्रकल्पांच्या अंदाजित किंमतीपेक्षा अधिक खर्च होणार नाही, याची कटाक्षाने खबरदारी घ्यावी.

६. लघुपाटबंधारे योजनेसाठी (० ते २५० हेक्टर) मंजूर केलेल्या तरतूदींचा ताळमेळ ठेवण्याची जबाबदारी अधीक्षक अभियंता, लघुपाटबंधारे (स्था.स्त) मंडळ, ठाणे, पुणे, औरंगाबाद, अमरावती व नागपूर यांची असून त्यावर मुख्य अभियंता, लघुपाटबंधारे (स्था.स्त) पुणे यांचे नियंत्रण राहील. या बाबत जरुर तर खातरजमा करण्यासाठी महालेखापाल महराष्ट्र -१ मुंबई व महालेखापाल, महाराष्ट्र -२, नागपूर यांच्याकडे तपासणीसाठी सर्व संबंधित कर्मचारी/अधिका-यांनी कागदपत्रासह असून सादर करावेत व हिशेब तपासणीसांना लेखे तपासणीसाठी आवश्यक तो तपशील उपलब्ध करुन द्यावा.

७. शासन असेही आदेश देत आहे की, अधीक्षक अभियंता, लघुपाटबांारे (स्था.स्त) मंडळ, सर्व संबंधीत यांनी कोणत्याही परिस्थितीत प्रत्येक योजनांच्या बाबतीत त्यांच्या मूळ किंमतीपेक्षा अगर सुधारीत किंमतीपेक्षा योजनांवर अधिक खर्च होऊ नये, याची दक्षता घ्यावी. याशिवाय अधीक्षक अभियंता, लघुपाटबंधारे (स्था.स्त) मंडळ (सर्व) (संबंधित) यांच्या जबाबदा-या पुढील प्रमाणे राहतील.

(अ) वार्षिक अंदाजपत्रके तयार करणे व शासनास सादर करणे.

(ब) महालेखापाल, लोकलेखा समिती , पंचायत राज समिती, मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा यांना आवश्यक ती माहिती पुरविणे.

(क) सांख्यिक माहिती वेळच्यावेळी संकलित करणे व संबंधितांना सादर करणे.

(ड) शासकीय नियतकालीक विवरणपत्राची माहिती सर्व संबंधितांना सादर करणे.

(इ) प्रगती अहवाल तसेंच विनियोजन लेखे भाग-१ व भाग-२ सादर करणे आणि योजनेवर नियंत्रण ठेवणे.

८. मुख्य अभियंता, लघुपाटबंधारे (स्था.स्त) पुणे यांना अधीक्षक अभियंता लघुपाटबंधारे (स्था.स्त) मंडळ नाशिक, पुणे, औरंगाबाद अमरावती व नागपूर यांच्याकडून माहीती जमा करुन व संकलित करुन ती शासनास सादर करावी. अशी माहिती सादर करण्याचा "समन्वयक" (कोऑर्डीनेटर) म्हणून त्यांचेवर जबाबदारी राहील.

९. हे आदेश वित्त विभागाकडील परिपत्रक क्र.लेखानु-२०११/ सीआर-६५/अर्थसंकल्प-३, दि. ३१ मार्च,२०११ मधील सूचनांनुसार व निदेशानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०११०५२०१७०८५७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( प्र.के मोटे )

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

मुख्य अभियंता, लघुपाटबंधारे (स्था.स्त) महाराष्ट्र राज्य पुणे-६

महालेखापाल-१, महाराष्ट्र राज्य (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) मुंबई

महालेखापाल-२, महाराष्ट्र राज्य (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) नागपूर

मा. मंत्री (जलसंधारण) यांचे खाजगी सचिव

मा. राज्यमंत्री (जलसंधारण) यांचे खाजगी सचिव

अधीक्षक अभियंता लघुपाटबंधारे (स्था.स्त) मंडळ ठाणे, पुणे, औरंगाबाद, अमरावती, नागपूर

कार्यकारी अभियंता, लघुपाटबंधारे (स्था.स्त) विभाग (सर्व )

कार्यकारी अभियंता, लघुपाटबंधारे, जिल्हा परिषदा (सर्व )

जिल्हा कोषागार अधिकारी जिल्हा ( सर्व )

वित्त विभाग, का. क्र. व्यय-१५ व का. क्र.अर्थ-१७ मंत्रालय.

नियोजन विभाग, का क्र १४६१ व १४५१.

ग्राम विकास व जलसं. वि. का. क्र. वित्त-१, वित्त-२, वित्त-६, जल-१,जल-३, जल-११, जल-१९

निवडनस्ती (जल ४)

| | विवरणपत्र | | |
|---|---|---|---|
| सन २०११-१२ सर्व्हेक्षणाकरीता मंजूर निधी १०१ ते २५० हेक्टर सिंचन क्षमतेच्या बिगर आदिवासी क्षेत्रातील लघु पाटबंधारे योजनाकरीता निधी वितरण २७०२ ३३९१ शासन निर्णय क्र. लपायो-२०११/प्र.क्र.१२८/जल-४, दि. २० मे २०११ चे सहपत्र ( रक्कम लाखात ) | | | |
| अ.क्र. | जिल्हा | सर्व्हेक्षण पूर्ण झालेल्या कामाची प्रलंबित देयके | |
| | | योजनांची संख्या | मंजूर निधी |
| १ | २ | ३ | ४ |
| १ | ठाणे | ० | ०.०० |
| २ | रायगड | ६ | ३७.६७ |
| ३ | रत्नागिरी | ७ | ४५.६३ |
| ४ | सिंधुदुर्ग | ३ | ३७.८३ |
| | **ल.पा. मं. ठाणे** | १६ | १२१.१३ |
| ५ | नाशिक | ० | ० |
| ६ | धुळे | ० | ० |
| ७ | नंदूरबार | ० | ० |
| ८ | जळगांव | ० | ० |
| ९ | अहमदनगर | ० | ० |
| | **ल.पा. मं. नाशिक एकूण** | ० | ० |
| १० | पुणे | ८ | १५.७० |
| ११ | सातारा | १७ | १५.०० |
| १२ | सांगली | ० | ०.०० |
| १३ | सोलापूर | २ | १.२२ |
| १४ | कोल्हापूर | ० | ०.०० |
| | **ल.पा. मं. पुणे** | २७ | ३१.९२ |
| | **उर्वरित महाराष्ट्र एकूण** | ४३ | १५३.०५ |
| १५ | **औरंगाबाद** | २५ | ३४.०० |
| १६ | जालना | ० | ०.०० |
| १७ | परभणी | ० | ०.०० |
| १८ | हिंगोली | ० | ०.०० |
| १९ | बीड | ९ | ३३.१० |
| २० | नांदेड | ० | ०.०० |
| २१ | उस्मानाबाद | ० | ०.०० |
| २२ | लातूर | ० | ०.०० |
| | औरंगाबाद /मराठवाडा एकूण | ३४ | ६७.१० |
| २३ | अमरावती | १३ | २०.४९ |
| २४ | यवतमाळ | ३ | ४.८६ |
| २५ | अकोला | ० | ०.०० |
| २६ | वाशिम | ० | ०.०० |
| २७ | बुलढाणा | ९ | १९.१० |
| | **ल.पा. मं. अमरावती** | २५ | ४४.४५ |
| २८ | नागपूर | २९ | १६.८२ |
| २९ | वर्धा | २९ | १६.७७ |
| ३० | भंडारा | ० | ०.०० |
| ३१ | गोंदिया | १२ | ०.८१ |
| ३२ | चंद्रपूर | ० | ०.०० |
| ३३ | गडचिरोली | ० | ०.०० |
| | ल.पा. मं. नागपूर | ७० | ३४.४० |
| | विदर्भ एकूण | ९५.०० | ७८.८५ |
| | एकूण | १७२ | २९९.०० |